महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत
प्रशासकीय मंजूरी देण्यात आलेल्या पाणी
पुरवठा व मलनि:स्सारण योजनांना अनुदान
वितरीत करण्याबाबत.
नगर परिषद धामणगांव रेल्वे, जि. अमरावती

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

## शासन निर्णय क्रमांकः सुनिअ २०१४/प्र.क्र. ४१८/पापु.२२

गो.ते. हॉस्पिटल संकुल इमारत, लोकमान्य टिळक मार्ग
मंत्रालय, मुंबई ४०० ००१
तारीख: २७ ऑक्टोबर, २०१५

**वाचा :**

१. शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांक- सुनिअ २००८/प्र.क्र.१/पापु२२, दिनांक २२ ऑक्टोबर, २००८
२. शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांक- सुनिअ २००८/प्र.क्र.१९८/पापु२२, दिनांक २३ डिसेंबर, २००८
३. शासन निर्णय पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांक- सुनिअ २०१३/प्र.क्र.४९२/पापु.२२ दिनांक १७.१.२०१४
४. शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र. सुनिअ-२०१४/प्र.क्र.४१८/पापु.२२ दिनांक २०.१.२०१५
५. कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार सेवा विभाग, नागपूर यांचे पत्र क्र. मजीप्रा/प्रव्यससेविना/तांशा-वि/३८०/२०१४, दि.१८.२.२०१४
६. मुख्याधिकारी, धामणगांव रेल्वे नगर परिषद यांचे दिनांक “निरंक” चे पत्र.

**प्रस्तावना :**

दिनांक २२ ऑक्टोबर, २००८ च्या शासन निर्णयान्वये नागरी पाणीपुरवठा, मलनि:सारण, शौचालय बांधकाम व घनकचरा व्यवस्थापनासंदर्भात पर्याप्त, गुणवत्तापूर्ण सेवा, किफायतशीर सेवाशुल्कामध्ये उपलब्ध करुन देणे व विविध तांत्रिक, आर्थिक व व्यवस्थापकीय सुधारणा करण्याचे उद्दीष्ट निर्धारीत करुन महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियान राबविण्यात येत आहे. राज्यातील सर्व नागरीकांना पाणी पुरवठा व मलनि:सारणाच्या सर्वव्यापक सुविधा निश्चितपणे उपलब्ध करुन देणे हा महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानाचा मुख्य उद्देश आहे.

२. महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत, शासन निर्णय, दिनांक १७.१.२०१४ अन्वये धामणगांव रेल्वे शहर पाणी पुरवठा योजनेच्या रु. ५०,८८,०००/- इतक्या सुधारणा कामास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार सेवा विभाग, नागपूर यांनी दि. १८.२.२०१४ च्या पत्रान्वये धामणगांव रेल्वे पाणी पुरवठा योजनेच्या सुधारणा कामांच्या रु. ४७,५५,४८०/- इतक्या निव्वळ किंमतीस (रुपये ५०,८८,०००/- इतक्या ढोबळ किंमतीस) तांत्रिक मान्यता दिली आहे. धामणगांव रेल्वे नगर परिषदेने स्वहिश्श्याची संपूर्ण रक्कम रुपये ५.०८ लक्ष रक्कम बँकेमध्ये जमा केली आहे. शासन निर्णय, दि.२०.१.२०१५ अन्वये अनुज्ञेय अनुदानापैकी रुपये २२.९० लक्ष इतके अनुदान धामणगांव रेल्वे नगर परिषदेस वितरीत करण्यात आले आहे. मुख्याधिकारी, धामणगांव रेल्वे नगर परिषद यांनी एकूण रुपये रु.२०.३६ लक्ष रुपयाचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर केले असून मंजूर सुधारणा कामे ६५% पूर्ण झाली असल्याचे कळविले आहे. सबब, धामणगांव रेल्वे पाणी पुरवठा योजनेस अनुज्ञेय अनुदानामधून १०% रक्कम रु.४.५८ लक्ष रक्कम राखून ठेवून उर्वरित अनुदान रु.१८.३२ लक्ष इतके अनुदान धामणगांव रेल्वे नगर परिषदेस वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

## शासन निर्णय :

महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत, शासन निर्णय, दि. १७.१.२०१४ अन्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेल्या धामणगांव रेल्वे पाणी पुरवठा योजनेच्या सुधारणा कामांकरीता अनुज्ञेय अनुदानापैकी १०% रक्कम राखून ठेवून उर्वरित अनुदान रुपये १८,३२,०००/- (रुपये अठरा लाख बत्तीस हजार फक्त) इतके अनुदान पुढील विवरणानुसार वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

(रक्कम लाखांत)

| शहराचे नांव | योजनेची एकूण किंमत | राज्य शासनाकडून अनुज्ञेय अनुदान (९०%) | नागरी संस्थेने निकषानुसार भरावयाची रक्कम (१०%) | नागरी संस्थेने भरलेली रक्कम | यापुर्वी वितरीत करण्यात आलेले अनुदान | राज्य शासना-कडून याद्वारे वितरीत करावयाचे अनुदान |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| धामणगांव रेल्वे | ५०.८८ | ४५.८० | ५.०८ | ५.०८ | २२.९० | **१८.३२** |
| | | | | | **एकुण रुपये** | **१८.३२** |

२. सदर योजनेअंतर्गत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना अनुज्ञेय होणाऱ्या सदर अनुदानावरील खर्च मागणी क्रमांक वाय-२, २२१५, पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१ पाणी पुरवठा १९२, स्थानिक संस्था, नगर पालिका इत्यादींना सहाय्य - राज्य योजना - (०२) (०२) नगरपालिकांच्या (स्थानिक संस्था) पाणी पुरवठा व जलनि:स्सारण योजनांसाठी सहायक अनुदान (२२१५ १६४७), ३१ सहायक अनुदान (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली करण्यात आलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा. संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था यांनी सदर लेखाशिर्षाखाली शासनाकडून उपलब्ध करुन दिलेल्या अनुदानातून उक्त

विवरणपत्रातील नमूद स्तंभ क्रमांक ७ मध्ये दर्शविल्याप्रमाणे संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना अनुदान वितरीत करावे, तसेच अनुदानाच्या या वितरणाचे स्वतंत्र लेखे ठेवावेत.

३. संबंधीत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने योजनेसाठी स्वतंत्र लेखे ठेवावेत आणि योजनेचा प्रगती अहवाल व उपयोगीता प्रमाणपत्रे नियमितपणे वेळोवेळी शासनास सादर करावी.

४. महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत शासकीय अनुदान प्राप्त करुन घेण्यासाठी संबंधीत नागरी संस्थानी शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांक- नापापु २००८/प्र.क्र.१/पापु-२२ दिनांक २२ ऑक्टोबर, २००८ मधील तरतूदीचा अवलंब करणे आवश्यक राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५१०२७१५३३०४३२२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prabhakar L Chakre

Digitally signed by Prabhakar L Chakre
DN: CN = Prabhakar L Chakre, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Desk Officer
Date: 2015.10.27 17:07:28 +05'30'

**(प्र.ल.चक्रे)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

- मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे खाजगी सचिव.
- प्रधान सचिव पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
- सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
- महालेखापाल १ -मुंबई/नागपूर.
- संचालक, नगरपालिका प्रशासन संचालनालय, मुंबई.
- विभागीय आयुक्त, महसुल विभाग, अमरावती विभाग, अमरावती
- जिल्हाधिकारी, अमरावती
- मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नागरी व ग्रामीण योजना, ठाणे.
- संचालक (वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई.
- संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई.
- अध्यक्ष/मुख्याधिकारी, नगरपरिषद, धामणगांव रेल्वे, जि. अमरावती
- जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती

- जिल्हा प्रकल्प अधिकारी, (नगरपालिका) जिल्हाधिकारी कार्यालय, अमरावती
- वित्त विभाग/नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
- कक्ष अधिकारी, पापु.०४,पापु.२०,पापु.२४, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
- निवडनस्ती, पापु-२२.